आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ करीता शासकीय वसतीगृह बांधकाम (ओटिएसपी) लेखाशीर्ष (४२२५ १०९२ ) या अंतर्गत निधी वितरण आदेश..

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/ प्र.क्र. ११२ /कार्यासन.६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक: ०४ ऑगस्ट, २०२३.**

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.अर्थस-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२.०४.२०२३.

२) मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष यांचा दि.२२.०६.२०२३ रोजीचा प्रस्ताव.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या वर्षाकरीता मागणी क्रमांक टी-६ मुख्य लेखाशिर्ष ४२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च, ०२ अनुसूचित जमातीचे कल्याण, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०२) (०५) वसतीगृह बांधकाम (ओटिएसपी) (४२२५ १०९२), ५३-मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली रु. ६५००.०० लाख इतकी तरतुद अर्थसंकल्पीत आहे. आता वित्त विभागाने अर्थसंकल्पीत तरतुदीच्या २० टक्के मर्यादेत निधी उपलब्ध करुन दिलेला आहे. सदर लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पीय अंदाज वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-६ मधील शासकीय वसतीगृह बांधकाम (ओटिएसपी) (४२२५ १०९२), ५३- मोठी बांधकामे या खाली सन २०२३-२४ या वर्षातील अर्थसंकल्पीय तरतुदीपैकी **रु.१२२१.०० लाख (अक्षरी रुपये बारा कोटी एकवीस लाख फक्त)** इतका निधी खालीलप्रमाणे नियंत्रक अधिकारी तथा अधिक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, नाशिक/नागपुर यांना वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र | नियंत्रक अधिकारी | कामांची संख्या | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | अधीक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम(आदिवासी) मंडळ, नाशिक | ९ | ६५०.०० |
| २ | अधीक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम(आदिवासी) मंडळ, नागपुर. | ११ | ५७१.०० |
| **एकुण** | | **२०** | **१२२१.००** |

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS )वर वितरीत करण्यात येत असुन सदर निधी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमुद एकूण २० **कामांवर** रकाना **४** मध्ये नमुद केलेल्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

३. सदर निधीचे वितरण खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१) संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी अर्थसंकल्पीय प्रकाशन परिशिष्ट -ड मध्ये समाविष्ट असलेल्या कामांवरच खर्च करण्याबाबत तसेच प्रशासकीय मान्यतेच्या/सुधारित प्रशासकीय मर्यादेतच खर्च करण्याबाबत दक्षता घ्यावी.

२) सोबतच्या विवरणपत्रात नमुद केलेल्या २० कामांवरच सदरील निधी खर्च होईल याची दक्षता संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.

३) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, नाशिक/**नागपुर** यांचे मार्फत सदर बांधकामांना वेळोवेळी भेटी देण्यात येवून कामाचा दर्जा, गुणवत्ता यांची तपासणी करावी व वितरीत करण्यात आलेला निधी योग्य रित्या खर्च होत आहे याची दक्षता घ्यावी.

४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग नाशिक, ठाणे,अमरावती यांनी अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ यांचेमार्फत सादर केलेल्या मागणीस अनुसरुन निधी वितरीत करण्यात येत असुन सदर निधी तात्काळ खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

५) सदर वितरीत निधीमधुन झालेल्या खर्चाचा अहवाल नियंत्रक अधिकारी यांनी एकत्रित करुन तो विहित प्रपत्रात शासनास सादर करावा.

६) वित्त विभागाच्या वेळोवेळी निर्गमित शासन परिपत्रकामधील विहित केलेल्या अटी व शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे दि.१२.०४.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२८१२२९३४२७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.08.05 08:43:12 +05'30'

**(राजेंद्र दे.भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव,आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपुर/अमरावती
६. सर्व प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्र, महाराष्ट्र.
७. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ,नागपुर.
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, नाशिक/चंद्रपूर)
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/धुळे/नाशिक/नंदुरबार/अमरावती/नागपुर/चंद्रपुर.
१३. वित्त विभाग (व्यय १४/अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई-३२
१४. कार्यासन -५/१३, आदिवासी विकास मंत्रालय,मुंबई-३२
१६.निवड नस्ती (का-६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

| शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/ प्र.क्र.११२/कार्यासन.६, दि.०४ ऑगस्ट,२०२३ सोबतचे विवरणपत्र. | | | |
|---|---|---|---|
| | | | (रु.लाखात) |
| अ. क्र. | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता किंमत | निधी वितरण |
| १ | २ | ३ | ४ |
| कार्यकारी अभियंता, नाशिक (सार्व. बांधकाम आदिवासी विभाग) | | | |
| १ | नकाणे ता. जि. धुळे येथे आदिवासी मुलांचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम करणे | १४८४.२२ | १००.०० |
| २ | मौजे महंमदवाडी हडपसर पुणे येथे आदिवासी मुलांचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम करणे | ४४८५.०० | ६०.०० |
| ३ | दोंडाईचा जि. धुळे येथे आदिवासी मुलींचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम करणे | १०१७.८२ | ५०.०० |
| ४ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, छत्रपती संभाजीनगर, परिसरातील मुलांचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम करणे | ७७५९.७९ | ९०.०० |
| ५ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, छत्रपती संभाजीनगर, परिसरातील मुलींचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम करणे | ३९२९.५९ | ५०.०० |
| **५** | **एकुण नाशिक (आदिवासी विभाग)** | **१८६७६.४२** | **३५०.००** |
| कार्यकारी अभियंता, ठाणे (सार्व. बांधकाम आदिवासी विभाग) | | | |
| १ | ठाणे ता. जि. ठाणे लोढा कॉम्पलेक्स भाईंदरपाडा येथील आदिवासी मुलींची शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम क्षमता (५०० जी+६) | १४६५.८८ | १२३.५० |
| २ | सुधागड (पाली) ता.सुधागड जि. रायगड येथे आदिवासी मुलांचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम इमारत | १२५०.०० | ८२.५० |
| ३ | पाली ( सुधागड ) येथे मुलींच्या वसतिगृहाचे बांधकाम करणे. ता.सुधागड, जि. रायगड. | ८१८.०८ | ६६.०० |
| ४ | बारव ता. जुन्नर जि. पुणे येथे आदिवासी मुलांचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम (BOYS HOSTEL. G +२ ) | ९५७.१८ | २८.०० |
| **४** | **एकुण ठाणे (आदिवासी विभाग)** | **४४९१.१४** | **३००.००** |
| **९** | **अ) एकुण अधिक्षक अभियंता,नाशिक (सार्व.बांधकाम आदिवासी मंडळ)** | **२३१६७.५६** | **६५०.००** |
| कार्यकारी अभियंता, अमरावती (सार्व.बांधकाम आदिवासी विभाग) | | | |
| १ | शासकीय मुलींचे वसतीगृह क्र.२ हिंगोली जि.हिंगोली | १०७३.०४ | ६२.२५ |
| २ | शासकीय मुलींचे वसतीगृह नवासारी ता.जि.अमरावती चे बांधकाम करणे | १३०३.९० | ६०.०० |
| ३ | शासकीय मुलांचे वसतीगृह कोलवड ता/जि.बुलढाणा | ८२५.४६ | ६०.०० |

| शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/ प्र.क्र.११२/कार्यासन.६, दि.०४ ऑगस्ट,२०२३ सोबतचे विवरणपत्र. | | | |
|---|---|---|---|
| | | | (रु.लाखात) |
| अ. क्र. | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता किंमत | निधी वितरण |
| १ | २ | ३ | ४ |
| ४ | शासकीय मुलींचे वसतीगृह कोलवड ता/जि.बुलढाणा | ८२५.४६ | ८०.०० |
| ५ | शासकीय मुलांचे वसतीगृह मोर्शी ता.मोर्शी जि.अमरावती चे बांधकाम करणे | ८३५.१३ | ७५.०० |
| **५** | **एकुण अमरावती (आदिवासी विभाग)** | **४८६२.९९** | **३३७.२५** |
| **कार्यकारी अभियंता,चंद्रपुर (सार्व.बांधकाम आदिवासी विभाग)** | | | |
| १ | गोंदिया जिल्ह्यातील आमगाव तालुक्यात मुलींचे वसतीगृह बांधकाम करणे. | ७१८.८४ | १३.७५ |
| २ | भंडारा जिल्ह्यातील तुमसर तालुक्यात मुलींचे वसतीगृह बांधकाम करणे. (पहिला व दुसरा माळा) | २२१.०२ | ५५.०० |
| ३ | भंडारा जिल्ह्यातील तुमसर तालुक्यात मुलांच्या वसतीगृहाच्या दुसऱ्या माळ्याचे बांधकाम करणे | ११०.५१ | २७.५० |
| ४ | चंद्रपूर जिल्ह्यातील जिवती तालुक्यात पाटण येथे आदिवासी मुलींचे वसातीगृहाचे बांधकाम करणे | ९१०.०० | ११०.०० |
| ५ | भंडारा जिल्ह्यातील पवनी तालुक्यात मुलींचे वसतीगृहाचे बांधकाम करणे. | ९१०.०० | २७.५० |
| **५** | **एकुण चंद्रपुर (आदिवासी विभाग)** | **२८७०.३७** | **२३३.७५** |
| **११** | **ब) अधिक्षक अभियंता, नागपुर (सार्व.बांधकाम आदिवासी मंडळ)** | **८०२९.६४** | **५७१.००** |
| **२०** | **एकुण अ)+ब)** | **३११९७.२०** | **१२२१.००** |